बृहन्मुंबईत न्यायिक अधिकाऱ्यांसाठी
सदनिका भाडे तत्वावर घेण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक-शानिवा-१५२४/प्र.क्र.१४३/२३-अ (निवास-२)**
मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक,मुंबई-४०० ०३२
दिनांक :- ०२ ऑगस्ट, २०२४

वाचा :- मा.प्रबंधक (निरीक्षण-२), उच्च न्यायालय, मुंबई यांचे No. B(W)A-6707 of 1991/1221/28775, dated 10.06.2024 चे पत्र

**प्रस्तावना** :-

बृहन्मुंबईतील शासकीय कार्यालयात कार्यरत शासकीय अधिकारी/कर्मचारी यांना सामान्य प्रशासन विभागाच्या अखत्यारितील शासकीय निवासस्थानाचे वाटप करण्यात येते. यामध्ये न्यायिक अधिकाऱ्यांचाही समावेश आहे. बृहन्मुंबईतील न्यायालयात कार्यरत असणाऱ्या जिल्हा न्यायाधीश संवर्गासाठी १०६ सदनिका व दिवाणी न्यायाधीश वरिष्ठ स्तर संवर्गासाठी १४९ सदनिका आणि ६ संक्रमण सदनिका अशा एकूण २६१ सदनिकांचा न्यायिक अधिकाऱ्यांना वाटप करण्याबाबत विचार केला जातो. यासाठी मा.उच्च न्यायालयाकडील शासकीय निवासस्थान वाटप समिती शिफारस करते व त्यानुसार या विभागाकडून वाटप आदेश निर्गमित केले जातात. बृहन्मुंबईत सामान्य प्रशासन विभागाच्या अखत्यारितील शासकीय निवासस्थानाची कमतरता आहे. न्यायिक अधिकाऱ्यांसाठी निवासव्यवस्था करण्याबाबत मा.उच्च न्यायालयात दि.०९.०५.२०२४, दि.१०.०६.२०२४ व दि.२०.०६.२०२४ रोजी बैठका आयोजित करण्यात आल्या होत्या. त्यामध्ये बृहन्मुंबईतील न्यायिक अधिकाऱ्यांसाठी निवासव्यवस्था अपुरी आहे, माझगांव येथील न्यायिक अधिकाऱ्यांसाठी असलेली पारिजात इमारत पाडून त्याठिकाणी नवीन इमारत बांधण्यात येणार आहे. तसेच चर्चगेट येथील केदार इमारत पाडून त्या ठिकाणीही नवीन इमारत बांधण्याची आवश्यकता आहे. अशा परिस्थितीत न्यायिक अधिकाऱ्यांसाठी निवासव्यवस्था करण्याबाबत बैठकीमध्ये आग्रही भूमिका घेण्यात आली. त्यानुसार शासनाने दिनांक ०४.०६.२०२४ रोजी १३ सदनिका मा.उच्च न्यायालयास उपलब्ध करुन दिल्या आहेत. तथापि सदर निवासव्यवस्था अपूरी पडत असल्याने बृहन्मुंबईत न्यायिक अधिकाऱ्यांसाठी आणखी निवासव्यवस्था करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

बृहन्मुंबईमध्ये न्यायिक अधिकाऱ्यांना शासकीय निवासस्थानाचे वाटप करण्यासाठी सामान्य प्रशासन विभागाकडे सध्या शासकीय निवासस्थाने उपलब्ध नाहीत. याबाबत मा.उच्च न्यायालयाकडून निवासव्यवस्था करण्याबाबत आग्रहाची मागणी केली जात आहे. ती विचारात घेऊन बृहन्मुंबईतील माझगांव येथील पारिजात इमारतीमधील १६ व केदार इमारतीतील ३ अशा १९ न्यायिक अधिकाऱ्यांना व नव्याने निर्माण झालेल्या पदाच्या अनुषंगाने ३२ अशा एकूण ५१ सदनिका ऑगस्ट २०२४ ते ऑक्टोबर २०२७ या कालावधीसाठी भाडे तत्वावर घेण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. सदर मान्यता फक्त न्यायिक अधिकाऱ्यांना लागू असेल.

सदर प्रकरणी कार्यकारी अभियंता, मध्य मुंबई (सा.बां.) विभाग, वरळी, मुंबई यांच्या प्रमाणपत्रानुसार एका सदनिकेचे एक महिन्याचे कमाल भाडे रु.१,२०,०००/- असेल अशा बृहन्मुंबईतील सदनिका भाडयाने घेण्यास तसेच या ५१ सदनिकांच्या एक वर्षाच्या कमाल रु.७,३४,४०,०००/- इतक्या भाडयाच्या खर्चासही मान्यता देण्यात येत आहे. याबाबत उपलब्ध करुन दिलेल्या सदनिकेच्या भाडयाची रक्कम व संबंधित न्यायिक अधिकाऱ्यांना अनुज्ञेय असणारा घरभाडे भत्ता याबाबत वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक-वेपुर-१२८७/६४३/सेवा-१०, दि.२५.०४.१९८८ मधील परिच्छेद-४ प्रमाणे कार्यवाही करण्याची दक्षता घेण्यात यावी.

२. सदर न्यायिक अधिकाऱ्यांचा प्रशासकीय विभाग विधि व न्याय विभाग आहे. त्यामुळे याबाबतचा खर्च विधि व न्याय विभागाकडून भागविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय दि.२३.०७.२०२४ रोजी मंत्रिमंडळाने दिलेल्या मान्यतेनुसार तसेच वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक-३९२/व्यय-४, दि.१८.०६.२०२४ व अनौपचारीक संदर्भ क्रमांक-४१४/व्यय-४, दि.२८.०६.२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२४०८०२१३४१४४३५०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DILIP PRABHAKAR DESHMUKH

Digitally signed by DILIP PRABHAKAR DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=89b94ecffd8918a2710a5d1d74df9831b69f2b6f91aaf28f5f7e4afef961baa1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DB7F7568A940BB360A1CE1BD2BDD5FF1D01208E90A71EDCCBE553BEC506CB3E6, cn=DILIP PRABHAKAR DESHMUKH
Date: 2024.08.02 13:56:31 +05'30'

**( दि.प्र.देशमुख )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.उप मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
६. मा.अपर मुख्य सचिव (मुख्य राजशिष्टाचार अधिकारी), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. मा.प्रधान सचिव व विधि परामर्शी, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
८. मा.प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९. मा.सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. मा.महाप्रबंधक, मा.उच्च न्यायालय, मुंबई
११. मा.प्रबंधक, (निरिक्षण-२), उच्च न्यायालय, अपिलेट साईड, मुंबई
१२. उप सचिव (व्यय-४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. उप सचिव, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. कार्यकारी अभियंता, इलाखा शहर विभाग, (सा.बां.वि.) यांचे कार्यालय, २ रा मजला, बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई ०१
१५. कार्यकारी अभियंता, मध्य मुंबई (सा.बां.) विभाग, वरळी, मुंबई
१६. उप विभाग, मध्य सार्वजनिक बांधकाम उप विभाग, पहिला मजला, बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई-०१
१७. अधिक्षक आमदार निवास, सार्वजनिक बांधकाम उप विभाग, पहिला मजला, बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई-०१
१८. उप अभियंता, दक्षिण सार्वजनिक बांधकाम उप विभाग, एम.टी.डी.कार्यालयासमोर, मादाम कामा मार्ग, मुंबई-३२
१९. उप अभियंता, पश्चिम सार्वजनिक बांधकाम उप विभाग, मलबार हिल, मुंबई-०६
२०. उप अभियंता, बांधकाम (सा.बां.) उप विभाग क्र.१, सावली इमारत, गणपत जाधव मार्ग, वरळी, मुंबई-१८
२१. उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग-१, शासकीय वसाहत वांद्रे (पूर्व), मुंबई-५१
२२. निवडनस्ती